**राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या आतिथ्य**
**<u>भत्त्यात सुधारणा करण्याबाबत.</u>**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक -रामाआ २००९/८८२/प्र.क्र.३५२/०९/सहा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ४/०३/ २०१०.

वाचा - शासन निर्णय सा.प्र.वि., क्रमांक - एसआयसी-२००६/१३२२/
प्र.क्र.४/०७/५, दिनांक ७/९/२००७.

**प्रस्ताविक :-**

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ मधील कलम १६ (५) (क) नुसार राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना देय असलेले वेतन व भत्ते व सेवेच्या इतर अटी व शर्ती निवडणुक आयुक्तांप्रमाणे असतील, अशी तरतुद आहे. Chief Election Commissioners and Other Election Commissioners (Conditions of Service) Act, 1991 व Chief Election Commissioners and Other Election Commissioners (Conditions of Service) Amendment Act, 1993 मधील कलम ८ तसेच, The Supreme Court Judges (Salaries & Conditions of Service) Rules 1958 मधील कलम २३ बी मधील तरतूदींच्या आधारे, उपनिर्दिष्ट शासन निर्णयाप्रमाणे राज्य मुख्य माहिती आयुक्तांना रु. ७,५००/- एवढा मासिक आतिथ्य भत्ता अनुज्ञेय करण्यात आला आहे. आता The Supreme Court Judges (Salaries & Conditions of Service) Rules 1958 मध्ये केंद्र शासनाच्या दि. ९/१/२००९ च्या अध्यादेशानुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तींना रु. ७,५००/- ऐवजी रु. १५,०००/- इतका आतिथ्य भत्ता अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे. सदर सुधारणा दि. १/०९/२००८ पासून अंमलात येईल असेही सदर अध्यादेशात स्पष्ट करण्यात आले आहे. त्यामुळे राज्य मुख्य माहिती आयुक्तांच्या आतिथ्य भत्त्यातही रु. ७,५००/- ऐवजी रु. १५,०००/- अशी वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

राज्य मुख्य माहिती आयुक्तांच्या आतिथ्य भत्त्यात विद्यमान रु. ७,५००/- ऐवजी रु. १५,०००/- अशी वाढ करण्यास शासनाने मान्यता दिली आहे. आतिथ्य भत्त्याचे सुधारीत दर दिनांक १/०२/२०१० पासून अंमलात येतील.

२.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक - अनौसं-४२६/ सेवा-५/ २००९, दि.२.२.२०१० अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर संगणक सांकेतांक क्रमांक २०१००३०४१३०५३१००१ वर प्रसिध्द करण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( रा. शि. अरवारी )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य,मुंबई

**प्रत :-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व हक्कदारी) महाराष्ट्र -२, नागपूर,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१, मुंबइ,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)महाराष्ट्र -२, नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबइ,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई ,
७) सचिव, राज्य माहिती आयोग महाराष्ट्र राज्य,मुंबई (५ प्रती),
८) वित्त विभाग, सेवा -५,मंत्रालय, मुंबई,
९) सामान्य प्रशासन विभाग/का.२५ ,
१०)निवडनस्ती कार्यासन-सहा.